१३ वा वित्त आयोग.

**१३ व्या वित्त आयोगांतर्गत वितरीत निधीतून, ई-पीआरआय / ई-पंचायत प्रकल्पासाठी महाऑनलाईनतर्फे कंत्राटी पद्धतीने जि.प./पं.स. /ग्रा.पं.स्तरावर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याची अदायगी जिल्हापरिषद स्तरावरून करणेसाठी द्यावयाच्या मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक- तेविआ २०११/प्र.क्र.४२/वित्त-४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक- १ नोव्हेंबर, २०११.**

वाचा- १) शासन निर्णय क्र.तेविआ २०१०/प्र.क्र.२२/वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक ३०/८/२०१०.
२) शासन निर्णय क्र.तेविआ २०११/प्र.क्र.२९/वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई , दिनांक २५/३/२०११.
३) सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्र.मातंसं/ नस्ती-०८ /७० दि.२७ जुलै २००९ व दि. २२ मार्च २०११.
४) शासन निर्णय क्र.व्हीपीएम २०१०/प्र.क्र.६/पंरा-३, ग्राग विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक २६/४/२०११.
५) शासन निर्णय क्र.व्हीपीएम २०१०/प्र.क्र.६/पंरा-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक ३०/४/२०११.
६) शासन परिपत्रक, क्रमांक- तेविआ २०११/प्र.क्र.४२/वित्त-४ मंत्रालय, मुंबई-३२. दिनांक- ३०/४/२०११.
७) शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय, मुंबई-३२. दिनांक- २८/९/२०११.

प्रस्तावना :-

राज्यातील पंचायत राज संस्थांचे बळकटीकरण करुन त्यांचे कामात सुसूत्रता, एकसूत्रीपणा व पारदर्शकता आणण्यासाठी केंद्र शासनाच्या पंचायत राज मंत्रालयाने e-PRI/e-Panchayat हा प्रकल्प राबवण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्यातील पंचायत राज संस्थांमध्ये ई-पीआरआय हा प्रकल्प राबविण्याचा निर्णय संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये ग्राम विकास विभागाने घेतला आहे. सदर प्रकल्पासाठी १३ व्या वित्त

आयोगाच्या वितरीत निधीतून सर्व ग्रामपंचायतीना, पंचायत समितींना व जिल्हा परिषदांना, केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या विविध सॉप्टवेअर्सची अंमलबजावणी होईल अशा उच्चक्षमतेच्या संगणक, प्रिंटर कम स्कॅनर मशीन,यु.पी.एस. ई-स्वाक्षरी मोड्यूल, इंटरनेट जोडणी अशा सुविधा पुरविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच, ई-पीआरआय प्रकल्पाचे कार्यान्वयन सुरळीत होण्यासाठी महाऑनलाईनतर्फे पंचायत राज संस्थांना उपलब्ध करुन दिलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून दरमहा द्यावयाचा मोबदला व त्या मोबदल्याची अदायगी महाऑनलाईनला करण्याबाबतची कार्यवाही यासंदर्भात संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. ई-पीआरआय प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाऑनलाईनतर्फे पंचायत राज संस्थांना पुरविण्यात आलेल्या कंत्राटी मनुष्यबळाने करावयाची कामे व त्यांना द्यावयाच्या मोबदल्याच्या अदायगीबाबतच्या सूचना संदर्भ क्र.७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. महाऑनलाईनतर्फे संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकानुसार जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर जे तांत्रिक मनुष्यळ उपलब्ध करुन देण्यात आले आहे,त्या मनुष्यबळाला १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपध्दती व प्रक्रिया अधिक सुलभ व सोईस्कर व्हावी असे निदेश शासनाने दिले आहेत. त्यानुसार संदर्भ क्र.६ च्या परिपत्रकान्वये ठरविलेला मोबदला महाऑनलाईनतर्फे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला देताना पालन करावयाची सुधारित कार्यपध्दती व प्रक्रिया तसेच, १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल बेसिक ग्रँट व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात पुढील काळात पंचायत राज संस्थांना उपलब्ध होणा-या निधीतून महाऑनलाईनच्या तांत्रिक मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याबाबतचे नियोजन करण्यासंदर्भात या शासन निर्णयान्वये पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

शासन निर्णय-

ई-पीआरआय (ई-पंचायत) या प्रकल्पाच्या अंमलबजावणीस महाऑनलाईनतर्फे जिल्हा परिषद /पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर जे तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन

देण्यात येणार आहे, त्यांना द्यावयाच्या मोबदल्याबाबत संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकान्वये यापूर्वीच निदेश देण्यात आले आहेत. तसेच, महाऑनलाईनतर्फे पंचायत राज संस्थांच्या तीन्ही स्तरावर पुरविण्यात आलेल्या कंत्राटी मनुष्यबळाची निर्देशित कामे व त्यांना द्यावयाच्या मोबदल्याच्या अदायगीबाबतच्या आवश्यक सूचना संदर्भ क्र.७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकान्वये निश्चित केलेला मोबदला त्या तांत्रिक मनुष्यबळाने संदर्भ क्र.७ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेली कामे केल्यानंतर त्यांना अदा करण्यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

(अ) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला मोबदला अदा करताना पालन करावयाची सुधारित कार्यपध्दती-

ई-पीआरआय प्रकल्पांतर्गत महाऑनलाईनतर्फे संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकान्वये जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर कंत्राटी पद्धतीने तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात आले आहे. महाऑनलाईनतर्फे जिल्हा परिषद/ पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर उपलब्ध करुन देण्यात येणा-या तांत्रिक मनुष्यबळाला द्यावयाची मोबदल्याची रक्कम व त्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती संदर्भ क्र.६ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.(क ii) व त्या सोबतच्या विवरणपत्र -अ मध्ये नमूद करण्यात आली होती.

तथापि, संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. (क ii ) व त्या सोबतच्या विवरणपत्र-अ अन्वये मोबदल्याच्या अदायगीसंदर्भात प्रस्तावित केलेली कार्यपध्दती तसेच संदर्भ क्र.७ च्या शासन निर्णयात "महाऑनलाईन लि .ला कंत्राटी मनुष्यबळाच्या व इतर सेवा मोबदल्यापोटी अदा करण्याच्या देयकाबाबतची कार्यप्रणाली" यासंदर्भात देण्यात आलेल्या सर्व सूचना या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत. त्यामुळे यापुढे महाऑनलाईनतर्फे कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला संदर्भ.६ च्या शासन परिपत्रकान्वयें निश्चित केलेला मोबदला या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र -I (पृ.क्र.१०-१३) मध्ये नमूद सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करुनच अदा करावा.

(ब) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला नोव्हेंबर २०११ पर्यंतच्या कामासाठी अदा करावयाच्या मोबदल्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना-

ई-पीआरआय प्रकल्पांतर्गत महाऑनलाईनतर्फे संदर्भ क्र.६ च्या शासन परिपत्रकात नमूद जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर जे मनुष्यबळ इ-पंचायत प्रकल्प सुरु झाल्यापासून उपलब्ध करुन देण्यात आले आहे, त्या तांत्रिक मनुष्यबळाने नोव्हेंबर २०११ पर्यंत केलेल्या कामाचा मोबदला, ज्या दिनांकापासून त्या व्यक्तीची महाऑनलाईनतर्फे नेमणूक करण्यात आली आहे. त्या दिवसांपासून या निर्णयासोबतच्या विवरणपत्र -II (पृ.क्र.१४-१७) मध्ये नमूद केलेल्या विहित कार्यपध्दतीनुसार अदा करावा.

(क) १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल बेसिक ग्रँट व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात पुढील काळात पंचायत राज संस्थांना उपलब्ध होणा-या निधीतून ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईनने कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याबाबतचे नियोजन व अदायगी १ डिसेंबर २०११ पासून जिल्हापरिषद स्तरावरुन करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना-

दर वर्षी १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल बेसिक ग्रँटचे २ व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपातील दोन हप्ते केंद्र शासनाकडून प्राप्त होणे अपेक्षित आहेत. या पुढील काळात पंचायत राज संस्थांना जनरल बेसिक ग्रँट व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात उपलब्ध होणा-या निधीतून ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईनने जि.प/पं.स/ग्रा.पं स्तरावर पुरविलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला द्यावयाची मोबदल्याची रक्कम व त्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र-I(पृ.क्र.१०-१३)मध्ये नमूद करण्यात आली आहे.त्यानुसार ग्रामपंचायत/पंचायत समिती/जिल्हा परिषद स्तरावर नेमण्यात आलेल्या मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याचे नियोजन करताना १३ व्या वित्त आयोगाच्या जनरल बेसिक ग्रँट व जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात यापुढील काळात वितरीत हप्त्याच्या दिनांकापासून पुढील ६ महिन्याचे नियोजन करुन मोबदल्याच्या रकमेचे प्रगणन

करावे व त्यानुसार आवश्यक ती रक्कम जिल्हा परिषद स्तरावर बाजूला काढून ठेवावी व त्याची अदायगी जिल्हा परिषद स्तरावर या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र -I (पृ.क्र.१०-१३) नुसार करावी.

सर्व जिल्ह्याच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नावावर, ज्या बॅकेत १३ व्या वित्त आयोगाचे जिल्हा परिषदेचे खाते असेल त्या बॅकेत स्वतंत्र बचत खाते उघडावे व तिन्ही स्तरावर महाऑनलाईनने कंत्राटी पद्धतीने नेमेलेल्या मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याची रक्कम सदर बॅंक खात्यात ठेवावी.

तसेच, विभागाचे मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेने विभागीय स्तरावर नेमण्यात आलेल्या मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याच्या रकमेसाठीही बॅंकेत स्वतंत्र बचत खाते उघडावे. सदर खात्यात त्या विभागांतर्गत येणा-या सर्व जिल्हा परिषदांनी त्यांच्या हिश्याची रक्कम जमा करावी.

(ड) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे जिल्हा परिषद,पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला मोबदला अदा करताना पालन करावयाच्या सर्वसाधारण सूचना -

१) जिल्हा परिषद स्तरावर महाऑनलाईन तर्फे कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला अदा करावयाच्या मोबदल्याचे देयक महाऑनलाईनने उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांना सादर करावे.

२) पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर महाऑनलाईन तर्फे कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला अदा करावयाच्या मोबदल्याचे देयक महाऑनलाईनने संबंधित गट विकास अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांना एकाच वेळी सादर करावे.

३) पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर कंत्राटी पद्धतीने नेमलेल्या तांत्रिक मनुष्यबळाला अदा करावयाच्या मोबदल्याचे देयकाची एक प्रत महाऑनलाईनकडून संबंधित गट विकास अधिकारी यांना प्राप्त झाल्यानंतर गट विकास अधिकारी यांनी त्या देयकांची

पडताळणी करावी व सदरचे देयक १० दिवसांच्या आत उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांना सादर करावे.

४) महाऑनलाईनमार्फत कंत्राटी पद्धतीने जिल्हा परिषद/ पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाच्या मोबदल्याच्या अदायगीबाबतची तीनही स्तरावरील एकत्रित व एकूण रकमेची देयके उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांचेकडे महाऑनलाईनमार्फत सादर झाल्यावर उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी एकूण देयकाच्या रकमेच्या ९० टक्के रकमेच्या अदायगीची प्रक्रिया देयक प्राप्त झाल्यापासून १० दिवसांच्या आत करावी.सदर ९० टक्के रकमेच्या अदायगीसाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची मान्यता घेऊन सदर देयक मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडे सादर करावे.तदनंतर मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी देयक अदा करण्याची पुढील कार्यवाही करावी.

तसेच उर्वरीत १० टक्के रकमेच्या अदायगीची प्रक्रिया उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांचा जिल्हा परिषद स्तरावरील देयकाच्या पडताळणीबाबतचा अहवाल व संबंधित पंचायत समितीच्या गट विकास अधिकारी यांचा पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरील देयकाच्या पडताळणीबाबतचा अहवाल प्राप्त झाल्यावर ३ महिन्याच्या आत करावी.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर मोबदल्याच्या रकमेच्या अदायगीमध्ये कमी/अधिक रक्कम महाऑनलाईनला अदा झाल्यास दर तीन महिन्यांनी त्याचा जिल्हा परिषद पातळीवर उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडून अहवाल घ्यावा व त्या कमी/अधिक रकमेचे समयोजन पुढील ३ महिन्यात करावे.देयकाच्या अदायगी संबंधात काही विवाद उत्पन्न झाल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्याबाबत निर्णय घ्यावा.

६) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे ग्रामपंचायत स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळाकडून करुन घेण्यात यावयाच्या कामाच्या पूर्ततेबाबत ग्रामसेवकाने स्वतंत्रपणे नोंदवही ठेवावी व त्याबाबतचा त्रैमासिक अहवाल ऑनलाईन गट विकास अधिका-यांना सादर करावा.

७) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे पंचायत समिती स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळाकडून करुन घेण्यात यावयाच्या कामाच्या पूर्ततेबाबत गट विकास अधिकारी यांनी स्वतंत्रपणे नोंदवही ठेवावी व त्याबाबतचा त्रैमासिक अहवाल ऑनलाईन उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांना सादर करावा.

८) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे जिल्हा परिषद स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळाकडून करुन घेण्यात यावयाच्या कामाच्या पूर्ततेबाबत उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी स्वतंत्रपणे नोंदवही ठेवावी व त्याबाबतचा त्रैमासिक अहवाल ऑनलाईन मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सादर करावा.

९) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर नेमेलेले जे मनुष्यबळ आहे त्या मनुष्यबळाच्या मोबदल्याच्या अदायगीच्या हिशेबासाठी त्यांचे स्तरावर स्वतंत्र नोंदवह्या ठेवाव्या व याप्रकरणी योग्य ते नियंत्रण ठेवावे.

१०) मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी वित्त विभागात त्यांच्या स्तरावर सदर मोबदल्याच्या अदायगीचे स्वतंत्र लेखे ठेऊन काटेकोरपणे नियंत्रण ठेवावे.

मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर मोबदल्याच्या रकमेच्या अदायगीमध्ये कमी/अधिक रक्कम महाऑनलाईनला अदा झाल्यास दर तीन महिन्यांनी त्याचा जिल्हा परिषद पातळीवर उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडून अहवाल घ्यावा व त्या कमी/अधिक रकमेचे समयोजन पुढील ३ महिन्यात करावे.देयकाच्या अदायगी संबंधात काही विवाद उत्पन्न झाल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी लक्ष घालून त्याबाबत निर्णय घ्यावा.

११) ई-पीआरआय प्रकल्पासाठी महाऑनलाईन तर्फे जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळाला द्यावयाच्या मोबदल्याची देयके महाऑनलाईनला अदा करण्यास परिच्छेद क्र. ४ मध्ये नमूद केलेल्या विहीत कालमर्यादेपेक्षा विलंब केल्यास देयक रकमेवर द.सा.द.शे.१८ टक्के दराने व्याज महाऑनलाईनला अनुज्ञेय होईल व याची संपूर्ण जबाबदारी संयुक्तरित्या संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी ,उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांची असेल.

१२) सदर मोबदल्याची देयके १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून अदा करावयाची असून राष्ट्रीय इ-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत हा प्रकल्प कार्यान्वित असल्याने मुख्य कार्यकारी अधिकारी हे हा मोबदला अदा करण्यास पूर्णतः सक्षम व जबाबदार आहेत. यासाठी इतर कोणत्याही प्राधिका-याची परवानगी घेण्याची आवश्यकता नाही.

१३) मानधन अदायगीबाबतचा विवाद संबंधित पंचायत राज संस्था व महाऑनलाईन मध्ये न सुटल्यास यावर शासनाचा निर्णय अंतिम व सर्व संबंधितांवर बंधनकारक राहिल.

तरी वरील सूचनांचे सर्व जिल्हा परिषदांनी तंतोतंत पालन करावे व त्यानुसार कार्यवाही करावी.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक-201111021056270001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

( सुधीर ठाकरे )
सचिव
महाराष्ट्र शासन.

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.

मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व उपायुक्त (विकास)
सर्व उपायुक्त (सामान्य)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
संचालक तथा मुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,महाराष्ट्र राज्य,कोकण भवन,नवी मुंबई.
सर्व सहसचिव/उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७/ वित्त आयोग कक्ष.)
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( सर्व कार्यासने )
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

## विवरणपत्र -I

**१. जिल्हा परिषद स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास १ डिसेंबर-२०११ पासून द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -**

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्य बळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | संगणक प्रोग्रॅमर | १ | ४००००/- + कर | सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्रमांक .मातंसं/ नस्ती-०८ /७० दि.२७ जुलै २००९ व दि. २२ मार्च २०११. | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅक खात्यातून करावी. |
| २ | संगणक ऑपरेटर | ५ | ८०००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ /वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅक खात्यातून करावी. |

२.पंचायत समिती स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास १ डिसेंबर-२०११ पासून द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्य बळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | डेटा एन्ट्री ऑपरेटर | २ | ८०००/- + कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ /वित्त-४ दि. ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅंक खात्यातून करावी. |
| २ | संगणक तज्ञ | १ | १००००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दि. ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅंक खात्यातून करावी. |
| ३ | हार्डवेअर इंजिनियर | दर २५ ग्राम पंचायतीं साठी- १ | १००००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दि. ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅंक खात्यातून करावी. |

३. ग्रामपंचायत स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास १ डिसेंबर-२०११ पासून द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्य बळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ हजार पेक्षा जास्त लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी:- | | | | |
| १ | डेटा ऑपरेटर | १ हजार लोकसंख्येपेक्षा जास्त लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी प्रत्येकी १ | ८०००/-+ कर ( यात कंझ्युमेबल्सचा खर्चही अंतर्भूत आहे.) | ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३/ वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी.<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बँक खात्यातून करावी. |
| २ | १ हजार पेक्षा कमी लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी:- | | | | |
| १ | डेटा ऑपरेटर | १ हजार पेक्षा कमी लोकसंख्येच्या ३ ग्रामपंचायतीं साठी १ | ८०००/-+ कर ( यात कंझ्युमेबल्सचा खर्चही अंतर्भूत आहे.) | ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक - २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी या शासन निर्णयातील परिच्छेद ड (४) मध्ये नमूद प्रकियेचा अवलंब करून विहित कालावधीतच पूर्ण करावी.<br>देयकासाठी आवश्यक असलेल्या रकमेची अदायगी यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे नांवाने उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बँक खात्यातून करावी. |

४. विभागीय स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास १ डिसेंबर-२०११ पासून द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्यबळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | नेटवर्क इंजिनियर | प्रत्येक विभागासाठी १ | ५००००/-+ कर | सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्र.मातंसं/ नस्ती-०८/ ७० दि.२७ जुलै २००९ व दि.२२ मार्च २०११. | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक-व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६ /पंरा-३ मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक- २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी करण्याबाबतचे देयक महाऑनलाईनने उपायुक्त (विकास) यांचेकडे सादर करावे. त्यानंतर उपायुक्त (विकास) यांनी सदर देयकाची छाननी करुन, सदर देयक विभागाचे मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेच्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांचेकडे पाठवावे. तद्नंतर सदर जिल्हा परिषदेच्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे मान्यतेनंतर मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडे देयक पारित करणेसाठी पाठवावे.<br>एका विभागा अंतर्गत येणा-या सर्व जिल्हा परिषदांनी त्यांच्या हिश्याची रक्कम विभागाच्या मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेने सदर मोबदला देण्यासाठी उघडलेल्या बँकेच्या बचत खात्यात धनादेशाद्वारे जमा करावी. त्यातून विभागीय मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी मोबदल्याची रक्कम महाऑनलाईनला अदा करावी.<br>याबाबत उपायुक्त(विकास) यांनी समन्वय ठेवावा. |

## विवरणपत्र-II

**१. जिल्हा परिषद स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास नोव्हेंबर-२०११ पर्यन्तच्या द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -**

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्यबळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | संगणक प्रोग्रॅमर | १ | ४००००/- + कर | सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्रमांक .मातंसं/ नस्ती-०८ /७० दि.२७ जुलै २००९ व दि. २२ मार्च २०११. | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर <u>विवरणपत्र-I</u> मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन अदा करावी. |
| २ | संगणक ऑपरेटर | ५ | ८०००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ /वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम शासन निर्णय, क्रमांक- व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६/पंरा-३ मंत्रालय,मुंबई-३२ दिनांक २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर <u>विवरणपत्र-I</u> मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन अदा करावी. |





एच-२२२८[८००-११-११]-८

२. पंचायत समिती स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास नोव्हेंबर-२०११ पर्यन्तच्या द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्यबळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | डेटा ऑपरेटर | २ | ८०००/- + कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ /वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम पंचायत समितीच्या गटविकास अधिका-याने धनादेशाद्वारे जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे वर्ग करावी व त्यानंतर सदर रकमेची अदायगी विवरणपत्र-I मध्ये नमुद कार्यपध्दतीचा अवलंब करुन पूर्ण करावी. |
| २ | संगणक तज्ञ | १ | १००००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम पंचायत समितीच्या गटविकास अधिका-याने धनादेशाद्वारे जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे वर्ग करावी व त्यानंतर सदर रकमेची अदायगी विवरणपत्र-I मध्ये नमुद कार्यपध्दतीचा अवलंब करुन पूर्ण करावी. |
| ३ | हार्डवेअर इंजिनियर | दर २५ ग्रामपंचायतींसाठी -१ | १००००/-+ कर | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम पंचायत समितीच्या गटविकास अधिका-याने धनादेशाद्वारे जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे वर्ग करावी व त्यानंतर सदर रकमेची अदायगी विवरणपत्र-I मध्ये नमुद कार्यपध्दतीचा अवलंब करुन पूर्ण करावी. |

३. ग्रामपंचायत स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास नोव्हेंबर-२०११ पर्यन्तच्या द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्यबळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ हजार पेक्षा जास्त लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी:- | | | | |
| १ | डेटा ऑपरेटर | १ हजार लोकसंख्येपेक्षा जास्त लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी प्रत्येकी -१ | ८०००/-+ कर (यात कंझ्युमेबल्सचा खर्चही अंतर्भूत आहे.) | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३/ वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम ग्रामसेवकाने धनादेशाद्वारे संबधित गटविकास अधिकारी यांच्याकडे व तद्नंतर गटविकास अधिकारी यांनी जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे वर्ग करावी. त्यानंतर सदर रकमेची अदायगी **विवरणपत्र-I** मध्ये नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करुन पूर्ण करावी. |
| २ | १ हजार पेक्षा कमी लोकसंख्येच्या ग्रामपंचायतींसाठी:- | | | | |
| १ | डेटा ऑपरेटर | १ हजार पेक्षा कमी लोकसंख्येच्या ३ ग्रामपंचायतींसाठी -१ | ८०००/-+ कर (यात कंझ्युमेबल्सचा खर्चही अंतर्भूत आहे.) | ग्राम विकास व जसंधारण विभाग शासन परिपत्रक क्र.तेविआ २०१०/ प्र.क्र.७३ / वित्त-४ दिनांक ८ डिसेंबर २०१० | या मनुष्यबळाची जेव्हा पासून नेमणूक झाली आहे. त्या दिवसापासून नोव्हेंबर २०११ अखेरपर्यन्त नेमलेल्या मनुष्यबळाने केलेल्या कामाच्या मोबदल्याची अदायगीची रक्कम ग्रामसेवकाने धनादेशाद्वारे संबधित गटविकास अधिकारी यांच्याकडे व तद्नंतर गटविकास अधिकारी यांनी जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे वर्ग करावी. त्यानंतर सदर रकमेची अदायगी **विवरणपत्र-I** मध्ये नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करुन पूर्ण करावी. |

४. विभागीय स्तरावर नेमलेल्या मनुष्यबळास नोव्हेंबर-२०११ पर्यन्तच्या द्यावयाच्या मोबदल्याची कार्यपद्धती -

| अ. क्र. | नेमावयाचे मनुष्यबळ | मनुष्यबळाची संख्या | द्यावयाचा प्रतिव्यक्ती प्रतीमाह मोबदला | संदर्भ | मोबदला देण्याची पद्धती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | नेटवर्क इंजिनियर | प्रत्येक विभागासाठी -१ | ५००००/-+ कर | सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्र.मातंसं/ नस्ती-०८/ ७० दि.२७ जुलै २००९ व दि.२२ मार्च २०११. | या मनुष्यबळाने शासन निर्णय, क्रमांक-व्हीपीएम-२०११/ प्र.क्र.६ /पंरा-३ मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक- २८/९/२०११ मध्ये निर्देशित केलेली कामे केल्यानंतर त्यास द्यावयाच्या मासिक मोबदल्याची अदायगी करण्याबाबतचे देयक महाऑनलाईनने उपायुक्त (विकास) यांचेकडे सादर करावे. त्यानंतर उपायुक्त (विकास) यांनी सदर देयकाची छाननी करुन, सदर देयक विभागाचे मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेच्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांचेकडे पाठवावे. तदनंतर सदर जिल्हा परिषदेच्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे मान्यतेनंतर मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडे देयक पारित करणेसाठी पाठवावे.<br>एका विभागा अंतर्गत येणा-या सर्व जिल्हा परिषदांनी त्यांच्या हिश्याची रक्कम विभागाच्या मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेने सदर मोबदला देण्यासाठी उघडलेल्या बॅंकेच्या बचत खात्यात धनादेशाद्वारे जमा करावी. त्यातून विभागीय मुख्यालय असलेल्या जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी मोबदल्याची रक्कम महाऑनलाईनला अदा करावी.<br>याबाबत उपायुक्त(विकास) यांनी समन्वय ठेवावा. |



-------